**महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ मधील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करणे, तसेच त्यांना अनुज्ञेय असलेल्या वार्षिक वेतनवाढी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मविसे-१०/प्र.क्र.८७/आस्था-३अ**
२५, मर्झबान पथ, बांधकाम भवन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ७ सप्टेंबर, २०१७

वाचा :-

१) शासन निर्णय, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, क्र.मविसे-१०/२०१२/प्र.क्र.११६/आस्था-३अ, दि.५.४.२०१३
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.हिंभाप-१००१/१२४५/प्र.क्र.८४/०२/२०-ब, दि.२२.१०.२००२.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही/प्र.क्र.५/९४/आठ, दि.३.२.१९९४
४) मालोआ अधिसूचना क्र.पी १ (२) (३९)/ ऑक्टोबर २०१३/एक दिनांक २०.४.२०१६

**आदेश:-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ अन्वये श्रीम.स्नेहा भरत कुडचे यांची महाराष्ट्र विकास सेवा गट-अ संवर्गात परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नेमणूक करण्यात आली होती. तसेच संदर्भाधीन शासन निर्णय क्र.२ नुसार श्रीम.कुडचे यांनी परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी (जसे कामकाज समाधानकारक असणे, मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे, वर्तणूक शोभनीय असणे, तसेच परिविक्षाधीन काळात त्यांनी उपभोगलेल्या रजा विचारात घेणे) समाधानकारपणे पूर्ण केल्या आहेत.

२. तसेच संदर्भ क्र.४ येथील अधिसूचनेनुसार श्रीम.कुडचे दि. ४ ते ६ ऑक्टोबर, २०१५ या कालावधीत घेण्यात आलेल्या ऑक्टोबर, २०१३ च्या विभागीय परीक्षेत उत्तीर्ण झाल्या आहेत. त्यामुळे खालील तक्त्यातील रकाना क्र. पाच मध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यास शासन मंजुरी देत आहे. त्याप्रमाणे श्रीम. कुडचे यांना अनुज्ञेय असलेल्या वार्षिक वेतनवाढी देवून त्यांची वेतननिश्चिती तात्काळ करण्यात यावी. तसेच श्रीम. कुडचे मराठी भाषा (उच्चस्तर व निम्नस्तर) परीक्षा संदर्भातील “महाराष्ट्र शासकीय कर्मचारी (न्यायिक विभागातील

कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त) मराठी भाषा नियम, १९८७” मधील तरतुदींची पूर्तता करतात. त्यामुळे त्यांना उक्त नियमातील नियम ४(४) मधील तरतुदी अन्वये नियुक्ती प्राधिकाऱ्यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार शासनाच्या एतदर्थ मंडळाच्या “मराठी भाषा” (उच्चस्तर व निम्नस्तर) परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येत आहे. श्रीम. कुडचे ह्या हिंदी भाषा (उच्च स्तर व निम्न स्तर) परीक्षा संदर्भात शासन निर्णय, सा.प्र.वि., दि.१.१२.१९८४ मधील अटींचीही पूर्तता करतात. त्यामुळे शासन निर्णय, सा.प्र.वि., दि.२२/१०/२००२ अन्वये नियुक्ती प्राधिकाऱ्यास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार श्रीम.कुडचे यांना “हिंदी भाषा” उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येत आहे.

| अ.क्र. | परिविक्षाधीन अधिकाऱ्याचे नाव | रुजू झाल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधीत घेतलेल्या रजा | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १. | श्रीम. स्नेहा भरत कुडचे | ६.४.२०१३ | ३३ दिवस | ८.५.२०१५ |

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०७१५४९२४६१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Natha Savane

Digitally signed by Rajendra Natha Savane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, serialNumber=f049989dbbef93340e9edd88af960a0963746d42baa5c948405b62e821529a99, cn=Rajendra Natha Savane
Date: 2017.09.07 16:50:32 +05'30'

(रा.ना.सवने)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, नाशिक/पुणे.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव, सांगली
३. महालेखापाल, महाराष्ट्र१-२/मुंबई/नागपूर.
४. संबंधित अधिकारी द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव.
५. कार्या. आस्था-२, कार्या. आस्था-३ ग्रामविकास व जलसंधारण विभाग.
६. निवडनस्ती